ई-साहित्य प्रकाशन

१८.०८.२००९
अंक : ४०

# नेटाक्षरी

काव्यांजली आणि मराठी कवितातर्फे दर महिन्याच्या पहिल्या पंधरवड्यात घेण्यात येतेय ‘नवरसरंग महाकविता स्पर्धा’.ह्या अंर्तगत १ जुलै -१५ जुलै ०९ ह्या कालावधीत रौद्ररसावरील स्वरचित कविता मागविण्यात आल्या होत्या.जगभरातून ह्या स्पर्धेतील प्रत्येक काव्यरसासाठी उदंड प्रतिसाद लाभतोय व मागील महिन्यातील रौद्ररसावर आधारित विजेत्या कवितांनी व स्वातंत्र्यदिनाच्या पार्श्वभूमीने सजलाय नेटाक्षरीचा हा अंक.




संपादक -

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
अहं ब्रम्हास्मि ( पुणे )
सचिन काकडे ( मुंबई )
सारंग भणगे ( पुणे )

विशेष अतिथी -

अरविंद महाजन ( नाशिक )

## ह्या अंकात वाचा..

* मैं आझाद हूं
* रौद्र रसिल्या कविता
* परीक्षकाच्या लेखणीतून

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

# मैं आझाद हूं..

## ..शब्दांजली..

देशासाठी,धर्मासाठी
मातीवरल्या प्रेमापोटी
सुटली मंगलची गोळी
तेजातून त्या रक्त चमकले
चारी दिशांनी मंगलच्या
नंतर त्याच गिरविल्या ओळी

बंडखोरीचा वार होताच
गोऱ्यांनी त्रागा केला
गर्जून उठल्या ठिणगीने
सारा देश जागा केला

चेतसिंह,तात्या,सुलतान,टीपू
पेटून उठले सारे वीर
तलवारींसह विजा चमकल्या
अंगी खवळले तप्त रुधीर

कर्नाटक,प्लासी
अवध,दख्खन अन झाशी
डोळे पुसणारी गंगा दिसली
तेजाळली तव आशा नवी
नव्या उषेची किरणे हसली

देशावरच्या,मातीवरच्या
प्रेमाचे त्यांनी दिले दाखले
आईवरली ती प्रीत पाहूनी
क्षणभर गोरे इंग्रज वाकले

ही शब्दांजली त्या हुतात्म्यांना
ज्यांनी स्वातंत्र्याचे स्वप्न दिले
मातीच्या जखमांचे ऋण फेडाया
ज्यांनी वाहिली प्राण फुले

- सचिन काकडे (मुंबई)



## ..जाणीव..

धुंदीत मदन मस्तीच्या
आपलेपण विसरले आहे
त्या समर्पित त्यागाची
जाणीव कुणाला आहे ?

बलिदान जयांनी दिधले
पारतंत्र्यातून मुक्त केले
त्या शूर जवानांची
जाणीव कुणाला आहे ?

संस्थानिक भाई झाले
सौदेबाजी सारखे झाले
राष्ट्रपिता महात्म्याची
जाणीव कुणाला आहे ?

घरदाराची रांगोळी केली
आत्मसमर्पण हसत दिले
दो फुले वहाण्या त्यांना
जाणीव कुणाला आहे ?

- सोनाली घाटपांडे (पुणे)

# ..अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत..



अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत
कधी असतो विचारलं तर
२६ जानेवारी म्हणताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

राष्ट्रगीत कोणी लिहीलं?विचारलं तर
गुलजारचं नाव घेताहेत अन ब्रीदवाक्य कोणतं?
तर खाओ और खाने दो म्हणताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

खिसेभरु पुढारी नेते नवे
फक्त पक्षाची जाहिरात करताहेत
मोठमोठ्या बाता मारताहेत
अन नुसतीच आश्वासन देताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

भारतातलं मुख्य आकर्षण कोणतं
तर धारावीचं नाव घेताहेत
नुसत्याच कमिट्या नेमताहेत,अहवाल तयार करताहेत
म्हणे अनधिकृत इमारती पाडताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

हम सब एक है चा नारा खातांना आठवताहेत
अन जातीय दंगलीच्या वेळी विसरताहेत
मंदिरे उडवताहेत अन मस्जिदी पाडताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

बेरोजगारी सुटत नाही,गरिबी हटत नाही
आरोग्याच्या नावाने बोंबा आहेत
गलिच्छ वस्त्या वाढताहेत
अंधश्रध्दा जोपासताहेत
म्हणे वैज्ञानिक प्रगती करताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

पाश्चिमात्य संस्कृतीशी देवाण घेवाण करतांना
उघडेनागडे नाचताहेत
खऱ्या कला मरताहेत अन स्वतःची संस्कृती
विसरताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

शिक्षणाचा बोऱ्या वाजलाय
भ्रष्टाचार बोकाळलाय
स्फोटांवर स्फोट घडताहेत
सुरक्षा? सुरक्षेच्या नावाखाली बलात्कार घडताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

गलिच्छ राजकारणात ईमानदार घुसमटताहेत
अनुभवाच्या नावाखाली
प्रतिभा नाकारताहेत
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

शहरांचा विकास होतांना
खेडी अजूनच मागासताहेत
आदिवासींशी संपर्क कुठे आहे ?
अन अंदमार निकोबार किती जणांनी पाहिले
अन म्हणे स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

पण हे सारं बदलायचंय,सक्षम व्हायचंय
प्रगती करतांना आपलेपण जपायचंय
प्रयत्न सुरु झालेत,उत्साह जोश आहे
फक्त प्रोत्साहन मागताहेत सहानुभूती नाकारताहेत

आम्ही स्वातंत्र्यदिन साजरा करतो
असं अभिमानानी सांगण्याची वाट पाहताहेत
वारे बदलण्याची स्वप्न उराशी बाळगून
पुन्हा आज
स्वातंत्र्यदिन साजरा करताहेत

- रोहन घम (कल्याण)

# रौद्ररस विजेत्या कविता

## द्वितीय क्रमांकाची कविता

..उत्पात..

अवघडल्या पोटावरून
ती जेव्हा फिरवायची हात
आईची माया पोरीला
जाणवायची आत

मायेचा धागा ती हळूवार नाळ
घट्ट पकडून ठेवी ते इवलसं बाळ

दिवसभर चालायच्या मग
मायलेकीच्या गप्पा
भरून जायचा स्वप्नांनी
ओल्या मनाचा कप्पा

बापाला मात्र नको होती
ही चिमुकली कळी

मुलगी  होणार आपल्याला
हे त्याच्या उतरेनाच गळी

तो म्हणाला हा धागा तोडायचं,
नसत आलं ओठात
जर 'ती'  ऐवजी 'तो' असता
वाढत तुझ्या पोटात

शहारलेलं तिच बाळ
तिला घट्ट घट्ट बिलगलं
अन जगामधल्या प्रत्येक 'ती'च
 अस्तित्वच हादरलं
प्रत्येक ती मग पेटून ऊठली
हात त्याचा धरायला
तिचा हा जिवघेणा उन्माद पाहून
लागे  प्रत्येक 'तो ' थरथरायला



'ती' फुलंही बंड करून उठली
अन 'तो' गंध क्षणात तडफडून मेला
सावलीविना एकटा पडलेला 'तो' प्रकाश
कुजून सडून गेला

मग क्रोधिष्ट हवा घेऊन आली
मुसळधार बरसता झंझावात
दिसेल जो 'तो' जळून गेला
विद्युल्लतेच्या संतापात

'ती'च्या अस्तित्वाचा रौद्र तांडव
भीषण उत्पात करत गेला
अन मायलेकींचा हळूवार कप्पा
नव्या स्वप्नांनी भरत गेला

- धुंद रवी (मुंबई)

# तृतीय क्रमांकाची कविता

## ..शक्ती दे..

कड कड कड कर निनाद, गडगड कर मेघनाद
चित्कार तुझा, वार तुझा, धरणी दुभंग आज
शक्ती रूप होवून ये, जाळ पाप, कर विनाश
हवुनी प्रसन्न मज तू, शक्ती दे, शक्ती दे ..........

चिरत जा भस्मांची, प्रेतांची वाट तू
निवडूंग दाट उभे, मार्गातून काट तू
वेग घे, उद्वेग घे, दणदणू दे सर्व आज
दाह-देह, आग-प्राण, शक्ती दे, शक्ती दे ..........

दाही दिशा उजळू दे, लाल रंग पसरू दे
आत्म्याचा क्रोध तुझा, तांडवात उतरू दे
"त्राही माम" चित्कार , रक्त रक्त उधळू दे
पुनश्च दानव विनाश, शक्ती दे, शक्ती दे ..........



जळून उठे आज इथे, रक्त तुझे, भक्त तुझे
आगेतून कर मन तू, व्यक्त तुझे, सक्त तुझे
पसरू दे तनामनात, दाह तुझे, देह तुझे
अनुभवूदे शक्ती आज शक्ती दे, शक्ती दे ..........

शक्ती दे, शक्ती दे ..........
शक्ती दे, शक्ती दे ..........
शक्ती दे, शक्ती दे ..........

- अंबरीष देशपांडे (पुणे)

## चौथ्या क्रमांकाची कविता

## ..शपथ घे..

आग शमली,
धुराचे लोट ही विरले
आता पुन्हा गायले जातील
मुंबापुरीचे पोवाडे
स्तुतीसुमनं उधळणारे
पण मला सांग,
ही साहीष्णूता की हतबलता ?
ही शांतता की उदासिनता ?
ही सहनशक्ती की कचखाऊ वृत्ती?
ही चिकाटी की लाचारी ?

आग़ स्फोटाची विझली असेल
पण चितांची ?
ती नेहमीच धगधगत राहील
चल, एक कोलीत उचल
अन लाव चटका स्वतःला
आत.....खोल......स्वतःच्या मनाला
हा चटका झोंबू दे
अश्वत्थाम्याच्या जखमेसारखा चिघळू दे, भळभळू दे
इथून पुढे तुलाही लढ़ायचय, कारण
देशांना सीमा असतील
पण युध्दांना राहील्या नाहीयेत
शस्त्र घ्यायच तेव्हा घ्यावच लागेल
अन घेच पण आज
आज शपथ घे
 त्या हुतात्म्यांची
त्या वीर बहादुरांची
डौलदार तिरंग़्याची
अन लाडक्या मुंबापुरीची
आठव ते माधव ज्युलियनांचे शब्द –
लेखणी बंदूक घ्या वा तागडी वा नांगर
हिंदवी व्हा चाकर
एका रक्ताचेच आहो , साक्ष देई आतडे
भ्रांत तुम्हा का पडे ?



- रणजीत पराडकर (मुंबई)

## ..एका सागराची कथा..

एकदा काय झालं
एक सरिता रागावली
आपल्या boyfriend ला म्हणाली

हे रे काय सागर !
मीच का म्हणून?

दरवेळी मीच का
मीच का यायच खाली डोंगरावरून ?
आणायच रानावनातल सारं तुझ्यासाठी
दरी बघायची नाही
कडा बघायचा नाही
कशी सुसाट पळत येते मी
विरहव्याकूळ, संगमोत्सुक
कधी एकदा तुला गच्च मिठी मारीन
तुझ्यात हरवून, हरपून जाईन
आणि तू वेडा
तुझ लक्षच नसत कधी
सारखा त्या चंद्रीकेकडे टक लावून असतोस
उसळतोस तिच्यासाठी
तुझ्यासाठी पाणी आणते मी
पण तुला भरती येते तिच्यासाठी

मी नाही जा !
बोलणारच नाही आता
येणारही नाही
काठावरच्या लोकांना सांगून
मोठ्ठ धरण बांधीन
थांबून राहीन तिथच
बघच मग



सरिताच ती
बोलल्याप्रमाण वागली
सागर बिचारा तडफडला
आकसला, आतल्या आत झुरत गेला
शेवटी फुटला बांध त्याच्याही संयमाचा
उठला ताड
ओरडला दहाड
उफाळला वारा पिऊन
लाटाच तांडव घेऊन
सुटला सुसाट
सरितेच्या दिशेने

लोक येडे
म्हणाले 'सुनामी आली ! सुनामी आली !!'

- नाम गुम जायेगा (ठाणे)

# उत्तेजनार्थ कविता

## ..प्रश्न तसाच राहतो..

मी हटायचे की हट्टाने रेटायचे
प्रश्न तसाच राहतो
भीड चेपायची की भीक घालायची
प्रश्न तसाच राहतो

मीपण जपायच की माझं स्वत्व
प्रश्न तसाच राहतो
कुढत जगायच की जगवायच अस्तित्व
प्रश्न तसाच राहतो

अभिमान जपायचा की स्वाभिमान
प्रश्न तसाच राहतो
मोडून वाकायच की वाकून मोडायच
प्रश्न तसाच राहतो

पेटून उठायच की कुणीतरी पेटायच
प्रश्न तसाच राहतो
झोकून द्यायच की वाकून पहायच
प्रश्न तसाच राहतो

आपणच आपलेपण सिध्द करायचे
विस्तव आला तरी स्वत्व आता जपायचे
शिवबा नाही होता आले हे तर चालायचेच
नंगी तलवार उचलता येते एवढे तरी करायचे

मग प्रश्न कधी उरणार नाहीत
उत्तरे कुणाकडे मागावी लागणार नाहीत
आता फक्त ताठ कणा अन मानानं जगायच
पाठीवरचा वार छातीवर घ्यायला फक्त शिकायच

- प्रसाद जोशी (मुंबई)



## ..जाहला अंत..

करण्यास तिची बेछूट, कोडगी लूट,
घेतली सूट मानवे मोठी

लाऊन हावरी धार, सत्य हत्यार,
तोडल्या पार पुरातन गाठी

साहिले तिने ते हाल, हजारो साल,
कृत्य बेताल घातले पोटी

दिन एक जाहला अंत, टाकूनी खंत,
आवळीत दंत उचलली लाठी

"सोसणे आता न जरा संपवू नरा !!"
क्रुध्द ती धरा बोलली ओठी

थरकाप पावला देह, जाहला दाह,
उमटली आह! विनाशासाठी

फोडून तिचे मग ऊर, साकळे धूर,
आगीचा पूर लोटला पाठी

बेचिराख झाला वंश, न उरला अंश,
मृत्युचा दंश तयाला गाठी

- अहं ब्रह्मास्मि (पुणे)

# परीक्षकाच्या लेखणीतून..

रौद्र म्हणजे चीड,संताप,रागावणं,अगतिकता इ.बरेच अर्थ घेता येतील.ही चीड,हा राग,परिस्थिती,एकूणच जगण्याची व्यवस्था,मित्र,प्रेम,द्वेष,फसवणूक,अन्याय,राजकारण इ.कोणत्याही बाबीसंबंधी असू शकते.मात्र याचं नेमकं रुप/स्वरुप कवितेमध्ये आढळले पाहिजे,जाणवले पाहिजे.नुसते रौद्र शब्दाचा वापर कवितेमध्ये असला म्हणजे ती कविता रौद्र रसाची निश्चितच होत नाही.

कवीने कवितेतील शुध्दलेखनाकडे विशेष लक्ष द्यायलाच हवे.शब्दाची तोडातोडी,अशुध्दलेखन होता कामा नये.अशुध्द लिहल्याने शब्दांचा अर्थ बदलू शकतो.पर्यायाने कवितेचा तोल जाऊ शकतो.

स्पर्धेतील कवितांमध्ये बऱ्याच ठिकाणी जड,मोठमोठे शब्दं वापरले आहेत.पण,या शब्दांचा अर्थ समजून वापरले असते तर ते ठीक होते.समानार्थी शब्दं शेजारी शेजारी लिहलेले आढळले.कविता कठीण करणं किंवा लिहीणं सोप्पं आहे पण सोप्पी सुटसुटीत कविता लिहीणं अवघड आहे.ज्या शब्दांच्या अर्थाबद्दल पूर्ण खात्री नाही असे शब्दं कवितेत टाळावे.नाहीतर मग कविता शब्दंबंबाळ होते.अर्थ हाती लागत नाही,नुसते शब्दांचे बुडबुडे राहतात.

कवितेचा आत्मा म्हणजेच विषय.कवितेत वापरलेले शब्दं,प्रत्येक शब्दाचं वजन,कवितेची लय,डोळसपणे पहावी.कविता आटोपशीर असावी.आपली कविता पुनःपुन्हा आपणच वाचावी.दुरुस्ती आपोआप लक्षात येते.

स्पर्धेतील काही कविता अगदीच प्राथमिक स्वरुपाच्या आहेत.तर काही कवितांची सुरुवात चांगली झालेली आहे.पण मध्यातून कवितेचा तोल ढळल्यामुळे ती घरंगळत गेली आहे पण कवितेची निगराणी होणे महत्वाचे आहे.आता फार काही सांगत नाही पण कविता ही नुसती हौस राहू नये.उत्तम कवी व्हायचे असेल तर आधी उत्तम वाचक व्हावयास हवे.जितके जास्त वाचन व चिंतन कराल तेवढ्या नवीन कल्पना सुचतील.वाचनसुध्दा चौफेर हवे.नुसते काव्यसंग्रह नाही तर कादंबरीवाचन देखील हवे.निव्वळ काव्यसंग्रह वाचत राहिलात तर कदाचित कधीतरी,कुठेतरी त्याची गडद छाप किंवा सहीसही नक्कल आपल्याकडून नकळत होऊ शकते.त्यामुळे कथासंग्रह,कविता,आत्मचरित्रे,कादंबरी,प्रवासवर्णने इ.जे जे साहित्य या सदरात मोडते त्या सर्वांचं वाचन अभ्यास म्हणून झालं पाहिजे.तेव्हा कुठे कवितेची अंधुकशी वाट सापडायला मदत होते.

कवीवर्य केशवसुतांच्या शब्दांत सांगायचं झालं तर कविता ही वीज आहे.त्याला हात लावू पाहणारे ९९ टक्के लोक भस्मसात होतात.मीही त्यातलाच एक आहे.तेव्हा जाणीव आणि जबाबदारीने लेखन व्हावे.स्पर्धेतील कवितांमधील एका कवितेमध्ये माधव ज्युलियन यांचा उल्लेख हा मला सुखद धक्का होता.
स्पर्धेतील सर्व कवितांवर अभिप्राय देण्याची माझी पात्रता नाही पण तुमच्या सारख्या नवीन,चळवळया कवी व रसिकांना अनुभवातून आलेल्या चार गोष्टी सांगाव्या,त्यासाठी हा प्रपंच

लिहीते रहा,व्यक्त व्हा,मुक्त व्हा..





# मी..

पुरस्कार –
कवी गोविंद पुरस्कार (नाशिक सार्वजनिक वाचनालय)
व्यासपीठ दिवाळी अंक (द्वितीय पुरस्कार)
सकाळ दिवाळी अंक (द्वितीय पुरस्कार)

खरं तर सध्यातरी माझा बायोडेटा म्हणजे कविता लिहण्याची सतत धडपड करत राहणारा एक रसिक एवढाच आहे.लौकिकार्थाने बायोडेटा मध्ये शिक्षण,नोकरी इ.बाबतचा तपशील असतो.आता मी त्या बाहेर आहे.माझ्या कवितेच्या प्रवासाबाबत मात्रं असं म्हणता येईल की सुमारे ४०/४१ वर्षांपूर्वी कोण्या एके सकाळी मी कविता केली/लिहली त्याचं कारणही मजेशीर आहे.नाशिक येथे नाशिक कवीमंडळ ही संस्था तेव्हा कार्यरत होती.त्यांच्या एका कवीसंमेलनाला मी हजर राहिलो आणि आत कुठेतरी ठिणगी पडली.त्याची ऊब आजपर्यंत आतच सांभाळत आलेलो आहे.त्या प्रसंगानंतर आम्ही ७/८ मित्र कविता करु लागलो.काही काळानंतर कविता बऱ्यापैकी जमल्या म्हणजे साठल्या आहेत हे जाणवल्याने प्रत्येक कवीच्या ७ कविता अशा ७ कवींच्या ४९ कवितांचा ‘सप्तर्षी’ हा हस्तलिखित कविता संग्रह आम्ही प्रकाशित केला.या संग्रहाला प्रख्यात नाटककार कै.वसंतराव कानेटकर यांची प्रस्तावना लाभली होती.त्या काळात पॉकेटमनी ही संकल्पना आमच्या आभाळात सुद्धा नव्हती.एन.सी.सी चे परेडचे जे पैसे मिळायचे त्यातून हा कागदाचा खर्च भागवायचो.त्यानंतर दूसरा संग्रह टंकलिखित म्हणजे टायपिंग स्वरुपात काढला.त्यामध्येही आम्ही पाच कवी होतो.त्या संग्रहाचं नावही ऑफबीट होतं. ‘अशामंप्र’ हे नाव म्हणजे आमच्या प्रत्येकाच्या नावातील आद्याक्षर होतं.अरविंद,शाम,मंगेश,प्रमोद आणि प्रफुल्ल.या संग्रहाला डॉ.अनुराधा पोतदार यांनी प्रस्तावना लिहली होती.आणि नटसम्राट मा.दत्ता भट यांच्या हस्ते नाशिक येथेच त्यांचं प्रकाशन केलं होतं.पण या आमच्या नवेपणाच्या दिवसांत ज्येष्ठांचं प्रोत्साहन,मार्गदर्शन वेळोवेळी मिळालं.त्यामुळे आजपर्यंत माझ्यातला रसिक मेलेला नाही.मी आजही कविता लिहतो आहे.

ह्या काव्यप्रवासात आजतागायत अनेक पुरस्कार व प्रमाणपत्रे मिळालीत.गझल सागर प्रतिष्ठान या संस्थेने अंध लोकांसाठी प्रथमच ब्रेल लिपीत कविता संग्रह प्रकाशित केला,त्याचं नाव ‘स्पर्शांकुर’ असून सर्व भारतामधून आलेल्या कवितांमधून माझ्या ‘ब्रेल’ या अंध संशोधकावरची कविता या संग्रहात प्रसिध्द करण्यात आलेली आहे.
सांगण्यासारखं खुप आहे.पण इतकंच म्हणेन,

कविता माझा प्राण आहे अन जगण्याची आण आहे
शरीरामधल्या रुधिरामध्ये तिचे वसतिस्थान आहे

कविता ही चळवळच आहे आणि तुम्ही ती विविध माध्यमांद्वारे सुरु ठेवलेली आहे,तुमचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. कौतुक यासाठी की,आजकाल प्रथितयश,प्रस्थापित किंवा नवोदित साहित्यिक सुध्दा कविता म्हटली की अंगावर झुरळ पडल्यासारखे तोंड करतात.खरं तर प्रत्येकजण कवी असतो.त्या कवितेतली उर्जा ओळखायला आणि बाहेर यायला काही कारण घडावं लागतं.जो संवेदनाशील आहे,रसिक आहे त्याला कविता सर्वप्रथम आपल्या कवेत घेते.

मराठी कवितेसंबंधीच्या नेटाक्षरीच्या सर्व उपक्रमांना मी मनःपूर्वक शुभेच्छा देवून प्रचंड यश चिंतीतो.

- अरविंद महाजन (नाशिक)
परीक्षक व विशेष अतिथी



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.ह्याव्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन अंक वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास पाठवण्यास आमची काहीही हरकत नाही.सोबतच,असे करतांना आमच्या ईमेल चा अंर्तभाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.आपल्यासारख्या रसिकांच्या साह्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..*

**netaksharee@gmail.com**